**मौजे शेवगाव ता. शेवगाव जि. अहमदनगर येथील प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे घोटण ता. शेवगाव जि. अहमदनगर येथे स्थलांतरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०१८/प्र.क्र.१५३/आरोग्य ३**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १२ सप्टेंबर, २०१८.

**वाचा :**

**आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/ कक्ष-७अ/टे-७/प्रा.आ.केंद्र/स्थलांतर/शेवगाव/घोटण/अ.नगर/११५४-५८/२०१८, दिनांक ०८.०३.२०१८.**

**प्रस्तावना :**

मौजे शेवगाव ता. शेवगाव जि. अहमदनगर येथे ग्रामीण रुग्णालय मंजुर झाल्याने तसेच मौजे शेवगाव येथे नगरपरिषद सुरु झाल्याने त्या ठिकाणचे प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे घोटण ता. शेवगाव जि. अहमदनगर येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

२. मौजे शेवगाव ता. शेवगाव जि. अहमदनगर येथे ग्रामीण रुग्णालय मंजुर झाल्याने व मौजे शेवगाव येथे नगरपरिषद सुरु झाल्याने त्या ठिकाणचे प्राथमिक आरोग्य केंद्र मौजे घोटण ता. शेवगाव जि. अहमदनगर येथे स्थलांतरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे:

**अटी व शर्ती** :-

१) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोगय केंद्र कार्यान्वित होवू शकेल याकरीता संबंधित ग्रामपंचायतीने मोफत जागा उपलब्ध करुन देणे आनिवार्य असेल.
२) स्थलांतरीत ठिकाणी प्राथमिक आरोग्य केंद्र कार्यान्वित होवू शकेल अशी इमारतीची तात्पुरती व्यवस्था व कर्मचारी निवासाची व्यवस्था असणे आवश्यक राहील. ज्यायोगे या जागेत बाहयरुग्ण सेवा, स्त्री रुग्ण तपासणीसाठी स्वतंत्र व्यवस्था, प्रसूतीसाठी व्यवस्था, कर्मचारी बसण्याची व्यवस्था असणे आवश्यक आहे.

३) प्राथमिक आरोग्य केंद्र तात्पुरत्या स्वरुपात सुरु होई पर्यंत सदर प्राथमिक आरोग्य केंद्रातील अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा इतर प्राथमिक आरोग्य केंद्रासाठी उपलब्ध करुन घ्याव्यात.

४) २४ तास पाणी व लाईटची व्यवस्था, स्वच्छता गृहाची व्यवस्था इत्यादी सुविधा उपलब्ध असणे आवश्यक आहे.

५) सदर आरोग्य उपकेंद्राच्या बांधकामासाठी जिल्हा नियोजन व विकास मंडळाने त्यांच्या जिल्हा योजनेतून तरतूद उपलब्ध करुन घेणे आवश्यक आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०६१२५५१८४५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: CN = Rajendra Shamraoji Kaurte, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.09.12 12:27:13 +05'30'

**( रा.शा.कौरते )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्र जि.प.स्तर), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, नाशिक
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
७. जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा परिषद, अहमदनगर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
९. निवडनस्ती (आरोग्य-३).